महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियान
पाणी पुरवठा योजनेतील भांडवली
कामांच्या प्रस्तावास प्रशासकीय
मान्यता देण्याबाबत.
आळंदी,जि.पुणे.

**महाराष्ट्र शासन**

**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सुनिअ-२०१४/प्र.क्र. ७३ /पापु-२२**

जी.टी. रुग्णालय संकुल, ७ वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई- ४०० ००१.
तारीख: १३ ऑगस्ट, २०१४ .

**वाचा :**

१) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.नापापु २००८/प्र.क.१/पापु-२२, दिनांक २२ ऑक्टोबर,२००८,**
२) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. नापापु २००८/प्र.क. १९८/पापु - २२, दिनांक २३ डिसेंबर, २००८,**
३) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.नापापु २०१३/प्र.क्र.५२२/पापु-२२, दिनांक ३ ऑक्टोबर, २०१३,**
४) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.सुनिअ २०११/प्र.क.३५८/पापु २२, दिनांक २९ जुलै, २०११,**
५) **सदस्य सचिव,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई यांचे पत्र क्र.५३४,दि.११ ऑगस्ट, २०१४.**

**प्रस्तावना :**

राज्याच्या नागरी भागामध्ये संदर्भांकित दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयान्वये राबविण्यात येणाऱ्या महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत नागरी पाणी पुरवठा, मलनि:सारण, शौचालय बांधकाम व घनकचरा व्यवस्थापना संदर्भात पर्याप्त, गुणवत्तापूर्ण सेवा, किफायतशीर सेवाशुल्कामध्ये उपलब्ध करुन देण्याचा व विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करण्यासंदर्भात निर्धारित केलेले उद्दिष्ट साध्य करण्यासाठी सदर शासन निर्णयातील परिशिष्ट-१ मध्ये विहित केलेल्या विविध तांत्रिक, आर्थिक व व्यवस्थापकीय सुधारणा करणाऱ्या नागरी संस्थांच्या पाणी पुरवठा व मलनि:सारण योजनांसाठी अनुदान उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे.

**२. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत आळंदी, जि.पुणे पाणी पुरवठा योजनेच्या भांडवली कामांच्या रु.३५२४.५० लक्ष किंमतीच्या प्रस्तावास दिनांक २९ जुलै,२०११ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मंजूरी देण्यात आली होती. या योजनेत आळंदी व्यतिरिक्त ८ गावांचा समावेश करण्यात आलेला आहे. तथापि, या योजनेसाठी आवश्यक असलेली लोकवर्गणी रु.३.५२ कोटी आळंदी नगरपरिषदेने न भरल्याने योजनेची कामे सुरु होऊ शकली नाहीत. याबाबत मा.अध्यक्ष, विधानसभा यांचे अध्यक्षतेखाली दि.२८.२.२०१४ रोजी झालेल्या बैठकीत आळंदी व्यतिरिक्त ८ गांवे वगळून आळंदी पाणी पुरवठा योजनेतील भांडवली कामांचा प्रस्ताव सादर करण्याचे निर्देश देण्यात आले होते. त्यानुसार सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई यांनी आळंदी पाणी पुरवठा योजनेतील भांडवली कामांचा रु.३२२०.०० लक्ष किंमतीचा प्रस्ताव सादर करुन त्यास मान्यता देण्याची विनंती केली आहे.**

३. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत नागरी संस्थांच्या पाणी पुरवठा व मलनि:सारण प्रस्तावांना मंजूरी देण्यासाठी संदर्भिय दिनांक ३ ऑक्टोबर, २०१३ च्या शासन निर्णयान्वये गठीत केलेल्या राज्यस्तरीय सनियंत्रण व समन्वय समितीची बैठक दि.३१ जुलै,२०१४ रोजी आयोजित करण्यात आली होती. सदर बैठकीत **आळंदी** पाणी पुरवठा योजनेतील **रु. ३२२०.०० लक्ष किंमतीच्या भांडवली कामांच्या प्रस्तावास तांत्रिक मंजूरी घेणे तसेच योजनेची कामे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत करण्याच्या अटीच्या अधिन राहून मान्यता देण्यात आली आहे.** त्यानुसार मुख्य अभियंता, मजीप्रा, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे यांचे पत्र क्र.११८७ दि.११.८.२०१४ अन्वये भांडवली कामांच्या निव्वळ रु.३०,१०,२२,५००/- किंमतीच्या प्रस्तावास तांत्रिक मान्यता दिली असून **२%** योजना तयार करणे व **५%** सुपरविजन चार्जेससह योजनेची एकुण ढोबळ किंमत **रु.३२,२०,९४,१००/-** इतकी आहे.

४. उपरोक्त बाबींचा विचार करुन महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत **आळंदी** शहर पाणी पुरवठा योजनेतील **रु.३२,२०,९४,१००/-** किंमतीच्या भांडवली कामांना प्रशासकीय मंजूरी देणे तसेच उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील दिनांक २९ जुलै, २०११ चा शासन निर्णय अधिक्रमित करुन महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने सादर केलेल्या नवीन प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

**महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत सादर करण्यात आलेल्या पुणे जिल्हयातील आळंदी शहर पाणी पुरवठा योजनेतील भांडवली कामांच्या रु.३२,२०,९४,१००/- किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मंजूरी देण्यात येत असून उपरोक्त संदर्भ क्र.४ येथील दिनांक २९ जुलै, २०११ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यांत येत आहे. आळंदी शहरासाठी मंजूर केलेली उपांगे व त्यांच्या किंमतीचे विवरण पुढील पृष्ठाप्रमाणे आहे : -**

| अ.क्र. | उपांगाचे विवरण | निव्वळ किंमत |
|---|---|---|
| १. | ॲप्रोच चॅनल | रु. ३६,५८,१०० |
| २. | जॅकवेल | रु.१,१४,०८,००० |
| ३. | पंपगृह जॅकवेलवर | रु. १४,४८,००० |
| ४. | ॲप्रोच ब्रीज | रु. ४२,२१,७०० |
| ५. | प्रक्रियापूर्व पंपिंग मशिनरी | रु. १,५२,०६,३०० |
| ६. | प्रक्रियापूर्व उध्वरणवाहिनी | रु.१,२४,८६,२०० |
| ७. | दाबमोड टाकी | रु. ४९,६३,६०० |
| ८. | प्रक्रियापूर्व गुरुत्ववाहिनी | रु. २४,२५,५५,३०० |
| ९. | योजनेची चाचणी | रु. ६,९८,००० |
| १०. | दाबमोड टाकीजवळ संरक्षक भिंत | रु. ४३,७७,३०० |
| | **एकुण निव्वळ किंमत** | **रु. ३०,१०,२२,५००** |
| | **२ % योजना तयार करणे** | **रु . ६०,२०,४५०** |
| | **५ % सुपरविजन चार्जेस** | **रु. १,५०,५१,१२५** |
| | **एकुण ढोबळ किंमत** | **रु. ३२,२०,९४,०७५** |
| | **पूर्णांकात एकुण मंजूर ढोबळ किंमत** | **रु. ३२,२०,९४,१००** |

२. **आळंदी शहर पाणी पुरवठा योजनेतील भांडवली कामांचा वित्तीय आकृतीबंध खालीलप्रमाणे राहील :-**

| अ.क्र. | नागरी संस्थेचे नांव व वर्ग | योजनेंची मंजूर किंमत | नगर परिषदेसाठी अनुज्ञेय अनुदान (९० %) | नगर परिषदेचा सहभाग (१० %) |
|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** |
| १. | **आळंदी,** जि. पुणे **क** वर्ग नगरपरिषद | **रु. ३२,२०,९४,१००/-** | २८,९८,८४,६९०/- | ३,२२,०९,४१०/- |

३. **आळंदी शहर पाणी पुरवठा योजनेतील भांडवली कामांस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे :-**

१. आळंदी शहरासाठी मंजूर भांडवली कामे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत राबविण्यांत यावीत.

२. नगर परिषदेने भांडवली कामांस देण्यात आलेल्या प्रशासकीय मान्यतेच्या आदेशापासून ३ महिन्यात कामे सुरु न केल्यास सदर योजनेची प्रशासकीय मान्यता आपोआप रद्द होईल. तसेच या योजनेसाठी वितरीत करण्यात आलेले अनुदान वसुल करण्यात येईल. त्याचबरोबर भविष्यात नगर परिषदेचे पाणी पुरवठा किंवा मलनि:सारण प्रकल्प मंजूरीचा विचार करण्यात येणार नाही.

३. नगर परिषदेने रु.१०.०० लक्ष किंवा त्यापेक्षा अधिक मुल्यांच्या निविदांच्या शासन निर्णय मातंसं/नस्ती-२०१२/प्र.क्र.२७३/३९,दिनांक १९ जानेवारी, २०१३ नुसार ई-निविदा कार्यप्रणालीचा अवलंब करावा. याशिवाय ई-निविदा सुचना विहित पध्दतीने एका राज्यस्तरीय व एका स्थानिक मराठी वर्तमानपत्रात जाहिरात देऊन प्रसिध्दी करण्यात यावी. वर्तमानपत्रात दिलेल्या जाहिरातीची प्रत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या संबंधीत कार्यालयास पाठविण्यात यावी.

४. प्रशासकीय मंजूरी दिलेली कामे मंजूर केलेल्या किंमतीत पूर्ण करणे आवश्यक असून त्या कामांच्या खर्चात कोणत्याही प्रकारे वाढ झाल्यास तो भागविण्याची जबाबदारी नागरी स्थानिक संस्थेची राहील.

५. नगर परिषदेने त्यांचेकडे असलेले आयुर्विमा महामंडळाचे कर्ज, हमी शुल्क, खुल्या बाजारातील कर्ज, महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाची थकबाकी इत्यादी कर्जाची परतफेड करण्याबद्दल आर्थिक आराखडा सादर केल्यानंतरच निधी वितरीत करण्यात येईल.

६. नगर परिषदेने पाणी पुरवठा योजनेसाठी सुधारित वित्तीय आकृतीबंधानुसार त्यांच्या आर्थिक सहभागापोटी उभारलेला निधी विचारात घेऊन त्या प्रमाणात राज्य शासनाद्वारे अनुदानाचे वितरण करण्यात येईल.

७. दिनांक २२ ऑक्टोबर, २००८ च्या शासन निर्णयातील परिशिष्ट - १ मधील विहित सुधारणात्मक कार्यवाहीसाठी निश्चित केलेले उद्दिष्ट व त्याची कालमर्यादा लक्षात घेऊन नगर परिषदेने कृती आराखडा तयार करावा.

८. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत मंजूर होणाऱ्या पाणी पुरवठा व मलनि:सारण योजनेसाठी राज्य शासनाकडून प्राप्त होणारे अनुदान तसेच नगर परिषदेचा आर्थिक सहभाग राष्ट्रीयकृत बँकेमध्ये स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

९. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत मंजूर होणा-या पाणी पुरवठा व मलनि:सारण योजनेवरील खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र तसेच लेखापरीक्षण सादर करणे नगर परिषदेस अनिवार्य राहील.

१०. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांतर्गत प्रकल्प मंजूर करुन अनुदान मान्य करण्यासाठी स्थापन राज्यस्तरीय संनियंत्रण व समन्वय समितीचे निर्णय नगर परिषदेस अनिवार्य राहतील.

११. नगर परिषदेने त्यांच्या पाणी पुरवठा योजनेसाठी स्वतंत्र लेखा ठेवणे, सिंकींग फंडाची तरतूद करणे तसेच पाणी पुरवठयासाठी स्वतंत्र अंदाजपत्रक ठेवणे अनिवार्य राहील.

१२. ही भांडवली कामे पूर्ण झाल्यानंतर सदर पाणी पुरवठा योजना चालविण्यासाठी राज्य शासनाकडून कोणतेही आर्थिक सहाय्य मिळणार नाही.

१३. सदर मंजूर भांडवली कामांचा महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या सन २०१४-१५ च्या वार्षिक कृती आराखडा व मासिक प्रगती अहवालात समावेश करुन हा मासिक प्रगती अहवाल शासनास पाठवावा.

१४. महाराष्ट्र सुजल व निर्मल अभियानांर्तगत प्रकल्प मंजूर करुन अनुदान मान्य करण्यासाठी स्थापन राज्यस्तरीय संनियंत्रण व समन्वय समितीचे निर्णय नगर परिषदेस बंधनकारक राहतील.

१५. नगरपरिषदेने पाणी पुरवठा योजनेसाठी नियुक्त केलेल्या मनुष्यबळावरील तसेच, आस्थापनेवरील खर्च व त्यासाठी नगर विकास विभागाकडून प्राप्त अनुदानाची माहिती सादर करणे अनिवार्य राहील.

१६. पाणी पुरवठा योजना स्वयंसंतुलित होण्याकरिता नगर परिषदेने पाणीपट्टीच्या दरात सुधारणा करणे बंधनकारक राहील.

१७. मंजूर भांडवली कामांसाठी पहिला हप्ता वितरण केल्यानंतर दुसऱ्या हप्त्याची मागणी करताना स्थानिक संस्थेने उपरोक्त निर्देश तसेच, विशेष अटीशर्ती पूर्ण केल्याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडून तीन महिन्याच्या आत पडताळणी करुन घेणे आवश्यक असून, सदर अहवाल शासनास सादर केल्यानंतरच दुसरा हप्ता वितरीत करण्याबाबत कार्यवाही करण्यात येईल.

४. **आळंदी,जि.पुणे** पाणी पुरवठा योजनेतील भांडवली कामांचा खर्च मागणी क्र. वाय - २, २२१५, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, १९२, स्थानिक संस्था, नगरपालिका इत्यादींना सहाय्य- राज्य, (०२) (०२) नगरपालिकांच्या (स्थानिक संस्था) पाणी पुरवठा व जलनि:सारण योजनांसाठी सहाय्यक अनुदान (२२१५१६४७), ३१ सहाय्यक अनुदान, (वेतनेतर), या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व त्या खालील मंजूर तरतुदीतून भागवावा.

५. या योजनेसाठी प्रत्यक्ष शासकीय अनुदानाचे वितरण पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत करण्यात येईल. त्यानुसार संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई यांनी **आळंदी, जि.पुणे** पाणी पुरवठा योजनेतील भांडवली कामांसाठी अनुदान वितरित करावे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८१३१८४६५१४१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sule Vaishali M

Digitally signed by Sule Vaishali M
DN: CN = Sule Vaishali M, C = IN, S = Maharashtra, O = Govt of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.08.14 11:20:51 +05'30'

( वैशाली सुळे )
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव,
२. मा. राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव,

३. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
४. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
५. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई,
६. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,सिडको भवन,बेलापूर,नवी मुंबई,
७. महालेखाकार- १, मुंबई,
८. महालेखाकार-२, मुंबई,
९. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
१०.संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई,
११. विभागीय आयुक्त, महसूली विभाग, पुणे,
१२. जिल्हाधिकारी, पुणे,
१३.उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,
१४.मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागरी व ग्रामीण योजना, ठाणे,
१५.मुख्य अभियंता, मजीप्रा, प्रकल्प व्यवस्थापन सल्लागार सेवा, पुणे,
१६. मुख्य अभियंता, मजीप्रा, दैनंदिन परिचालन व देखभाल दुरुस्ती, ठाणे,
१७. मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, म.नि.सं.सं. कक्ष, ३ रा मजला, ए -विंग, मित्तल टॉवर्स, नरीमन पॉईन्ट, मुंबई,
१८. संचालक, लेखा कोषागार, मुंबई,
१९. अध्यक्ष/मुख्याधिकारी,नगरपालिका,आळंदी, जि.पुणे,
२०. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ,पुणे,
२१. कार्यकारी अभियंता, मजीप्रा, जल व उर्जा लेखापरीक्षण विभाग, पुणे,
२२. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
२३.जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, पुणे,
२४.जिल्हा प्रकल्प अधिकारी, नगरपालिका प्रशासन,जिल्हाधिकारी कार्यालय,पुणे,
२५.उप सचिव,पापु-०४,पापु-२० व पापु-२४,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई,
२६.वित्त विभाग/ नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
२७. निवड नस्ती, पापु-२२ ,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,मंत्रालय,मुंबई.